**श्रीमती सुमन धनंजय सदाफळे, सेवानिवृत्त मुख्याध्यापिका, गट-ब यांची सुधारित वेतननिश्चिती करून निवृत्तीवेतनात सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएटी-१००९/प्र.क्र.१३०/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०१७

**संदर्भ** :- आयुक्त (शिक्षण) यांच्या कार्यालयाचे पत्र क्रमांक : आस्था-अ/पवेनि/२०१५/१०१/६३८, दि. २७.०१.२०१६ व क्रमांक : आस्था-अ/पवेनि/२०१५/१०१/६३८, दि.३१.०३.२०१६

**प्रस्तावना :-**

श्रीमती सुमन धनंजय सदाफळे, या अराजपत्रित मुख्याध्यापक (उच्च माध्यमिक शिक्षक वेतनश्रेणीमधील) जिल्हा तांत्रिक सेवा गट-क या पदावर कार्यरत होत्या. त्यांची महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब मधील उपशिक्षणाधिकारी व तत्सम संवर्गात असलेल्या मुख्याध्यापक राजपत्रित या पदावर दिनांक १९.०८.२००३ रोजीच्या शासन आदेशान्वये पदोन्नती झाली. श्रीमती सदाफळे या अराजपत्रित मुख्याध्यापक या पदावर रू.८०००-२७५-१३५०० या वेतनश्रेणीमध्ये वेतन घेत होत्या. मुख्याध्यापक राजपत्रित, गट-ब या पदाची वेतनश्रेणी रू.६५००-१०५०० (सुधारित वेतनश्रेणी रु. ७५००-२५०-१२०००) अशी होती. एखाद्या पदावर पदोन्नती झाल्यावर महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (ए) अन्वये वेतननिश्चिती करण्यात येते. त्यानुसार श्रीमती सदाफळे यांची वेतननिश्चिती करण्यात आली. त्यामुळे पदोन्नती नंतर त्यांच्या जबाबदारीत वाढ झालेली आहे. मात्र त्यांना वेतन संरक्षण न दिल्यामुळे त्यांचे आर्थिक नुकसान होत असल्याने श्रीमती सदाफळे यांचे वेतन संरक्षित करण्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे -

**शासन निर्णय** :-

श्रीमती सुमन धनंजय सदाफळे, सेवानिवृत्त मुख्याध्यापक (राजपत्रित) यांची म.ना.से. (वेतन) नियम १९८१ च्या नियम ११(१) (अे) अनुसार पुढीलप्रमाणे वेतननिश्चिती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशील | वेतन |
|---|---|---|
| १ | अराजपत्रित मुख्याध्यापक वेतनश्रेणी | रु. ८०००-२७५-१३४०० |
| २ | महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-"ब" (प्रशासन शाखा) मुख्याध्यापक पदावरील वेतनश्रेणी | रु. ६५००-२००-१०५००<br>(सुधारित रु. ७५००-२५०-१२०००) |
| ३ | महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-"ब" मुख्याध्यापक या पदावर रुजू झाल्याचा दिनांक | दि. ०२.०९.२००३ |
| ४ | अराजपत्रित मुख्याध्यापक पदावरील वेतन दिनांक २९.०८.२००३ | रु. १०,२००/- |
| ५ | अधिक (+) पदोन्नती झाल्याने त्यांना देय असलेली वेतन वाढ रुपये २७५/- मिळून एकूण वेतन | रु.१०,२००+२७५ =रु.१०,४७५/- |
| ६ | राजपत्रित मुख्याध्यापक पदाच्या रु. ७५००-२५०-१२००० वेतनश्रेणीतील पुढील टप्पा दि. ०२.०९.२००३ | रु. १०,५००/- |
| ७ | वेतन निश्चितीनंतर पुढील वर्षी होणारी वेतनवाढ व दिनांक दि. ०२.०९.२००४ रोजीचे वेतन | रू.१०,५००+रू.२५०=रु.१०,७५०/- |

२. वरीलप्रमाणे वेतननिश्चिती करून श्रीमती सदाफळे यांना वेतन व भत्त्यामधील फरक अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी. तसेच त्यानुसार त्यांचे निवृत्तीवेतन सुधारीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४१/१६/सेवा-३ ला अनुसरून दिलेल्या सहमतीने व मा. मंत्री वित्त यांनी दिनांक १.०२.२०१७ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३०११८०१२३६०२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2017.03.01 18:02:24 +05'30'

**(र.प्र. आटे)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
२) शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल -२ (लेखा परीक्षा / लेखा अनुज्ञेयता), नागपूर

४) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती.
५) शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद बुलढाण.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
७) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य पुणे यांच्यामार्फत)
८) निवडनस्ती.